**केंद्र पुरस्कृत एकात्मिक पाणलोट**
**विकासव्यवस्थापन कार्यक्रम (IWMP)**
**सन २००९-१० मधील मंजूर पाणलोटांची**
**अंमलबजावणीकरीता राज्यहिस्सा वितरण**

महाराष्ट्र शासन
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय, क्र. एपाव्य ४४०९/प्र.क्र.५४/जल-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २३ फेब्रुवारी , २०१०.**

**संदर्भ :-.** शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र

1. सामासू २००९/प्र.क्र.४१/जल-२०, दिनांक २१ मे, २००८.
2. सामासू २००९/प्र.क्र.७/जल-८, दिनांक १७ एप्रिल,२००९.
3. एपाव्य ४४०९/प्र.क्र.५४/जल-८, दिनांक २२ डिसेंबर , २००९.
4. एपाव्य २००९/प्र.क्र.५४/जल-८, दिनांक २४ डिसेंबर, २००९.
5. असक २००९/प्र.क्र.६८/जल-११, दिनांक १२ जानेवारी, २०१०
6. असक २००९/प्र.क्र.८५/जल-११, दि.१३ जानेवारी, २०१०.
   आयुक्त (कृषि) यांचे कार्यालयाचे पत्र क्र-
7. सीजीडब्ल्यूडी/पीपीआर/२२३८/२००९/सीजी-३, दिनांक ३० ऑगस्ट,२००९.
   केंद्रीय, ग्रामीण विकास मंत्रालय भूसंसाधन विभाग यांचे पत्र क्र
8. .K 11012/17/2009/IWMP/(महाराष्ट्र), दि.२९ डिसेंबर,२००९.
9. अ.शा.पत्र क्रमांक - Z-११०११/२०/२००९/ पीपीसी, दि.९ डिसेंबर, २००९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने १ एप्रिल २००८ पासून पाणलोट विकासाकरीता सामाईक मार्गदर्शक सूचना २००८ लागू केल्या असून केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाच्या भूसंसाधन विभागाने केंद्र पुरस्कृत एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन कार्यक्रम (IWMP) जाहिर केला असून त्यास केंद्राचे ९० टक्के तर राज्याचे १० टक्के अर्थसहाय्य देण्याचा निर्णय झाला आहे. सामाईक मार्गदर्शक सूचना २००८ तसेच केंद्र शासनाने या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचनानुसार या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरिता वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा (VSLNA) तसेच जिल्हास्तरावर जिल्हा पाणलोट विकास युनिट (DWDU) संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये स्थापन केली आहे.

२. एकात्मिक पाणलोट विकास व्यवस्थापन कार्यक्रम (IWMP) सन २००९-१० या वर्षाकरिता रु.९.९६ लक्ष हे. क्षेत्रामध्ये २४३ प्रकल्पाची अंमलबजावणी करण्याबाबत संदर्भाधीन ३ व ४ येथील दिनांक .२२ व २४ डिसेंबर, २००९ शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याची प्रकल्प किंमत रु.१२५५.०८ कोटी (रु.एक हजार दोनशे पंच्चावन्न कोटी आठ लक्ष फक्त) रक्कम इतकी आहे. या प्रकल्प किमतीनुसार केंद्र राज्य हिस्सा अनुक्रमे रु.११२९.५७ कोटी (९०% ) रु.१२५.५१ कोटी (१०%)असा राहील.

३. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन ८ येथील दिनांक २९ डिसेंबर,२००९ च्या पत्रान्वये सन २००९-१० च्या प्रकल्पाकरिता केंद्राचा ९० टक्के प्रमाणे केंद्राचा रु.११२९.५७ कोटी प्रकल्प किंमत असून त्याच्या ६ टक्के प्रमाणे रु.६७.७७ कोटी इतका निधी वितरित करुन वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणे (VSLNA)च्या युनियन बँक ऑफ इंडीया, पुणे येथील बचत खात्यामध्ये जमा केला आहे. केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासनास सुध्दा सन २००९-१० मधील राज्य हिश्याच्या प्रकल्प किंमतीपैकी म्हणजेच रु.१२५.५१ कोटीपैकी ६ टक्केप्रमाणे रु.७.५३ कोटी निधी वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेच्या (VSLNA) पुणे येथील बचत खात्यात जमा करणे

आवश्यक आहे. यापैकी संदर्भाधीन दिनांक १२ जानेवारी,२०१० च्या शासन निर्णयानुसार रु.४.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाच्या भूसंसाधन विभागाने संदर्भाधीन ८ येथील दिनांक २९ डिसेंबर २००९ च्या पत्रान्वये सन २००९-१० करीता एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन कार्यक्रमांतर्गत ६१ मेगा पाणलोटामध्ये २४३ प्रकल्पांकरीता ९.९५ लक्ष हे. क्षेत्राचा विकास करण्याकरीता रु.१२५५.०८ कोटीचा (रु.एक हजार दोनशे पंचावन्न कोटी आठ लक्ष फक्त) कार्यक्रम मंजूर केला आहे. या कार्यक्रमास राज्य शासनानेही संदर्भाधीन ३ व ४ येथील दिनांक २२ डिसेंबर,२००९ व दिनांक २४ डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. संदर्भाधीन ८ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने २४३ प्रकल्पांच्या प्रकल्पपुर्व अंमलबजावणीकरीता पहिल्या हप्त्याच्या २० टक्केपैकी ६% प्रमाणे रु.६७.७७ कोटी (अक्षरी रूपये सदुसष्ट कोटी सत्त्यात्तर लाख)केंद्र हिश्श्याचा निधी वसुंधरा पाणलोट विकास यंपणेच्या युनियन बॅक ऑफ इंडिया पुणे येथील शाखेच्या बचत खात्यामध्ये जमा केला आहे. यानुसार रु.०७.५३ कोटी (अक्षरी रूपये सात कोटी त्रेपन्न लाख) इतका राज्य हिस्सा अनुज्ञेय आहे. या ६ टक्के हिश्शांची घटकनिहाय विगतवारी खालीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| प्रकल्पपुर्व कामातील घटक | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR)**१% पर्यंत** | ११.३० | १.२५ |
| प्रेरक प्रवेश उपक्रम **४% पर्यंत**<br>(Entry Point Activities) | ४५.१८ | ५.०२ |
| प्रकाअ प्रशासकीय खर्च/ व क्षमता बांधणी **१% पर्यंत**<br>(PIA Admin Expenditure & capacity bulding) | ११.३० | १.२५ |
| एकूण ६% | ६७.७७ | ७.५३ |

देय राज्यहिस्सा रू रु.०७.५३ कोटी (अक्षरी रूपये सात कोटी त्रेपन्न लाख) निधीपैकी संदर्भाधीन ६ येथील दिनांक १३ जानेवारी,२०१० च्या शासन निर्णयान्वये पुर्नविनियोजनाव्दारे उपलब्ध झालेला रु.०४.०००१ कोटी (अक्षरी रूपये चार कोटी एक हजार फक्त) निधी वितरीत करण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे. हा राज्य हिस्सा रू ४.०००१ कोटी (अक्षरी रूपये चार कोटी एक हजार फक्त) वसुंधरा पाणलोट विकास यत्रणेच्या (VSLNA) खात्यात जमा करण्यासही मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाच्या सन २००९-१० मधील मान्यताप्राप्त २४३ प्रकल्पांच्या रु.१२५५.०८ कोटी प्रकल्प किंमतीपैकी ६% प्रमाणे मंजूर केलेला निधी तसेच वितरीत करण्यात येत असलेला राज्य हिस्सा वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेस (VSLNA) परिच्छेद १ मध्ये दर्शविलेल्या विवरणपत्रानुसार घटकानिहाय खर्च करण्यासही मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त (कृषि) यांस सदरहू निधी आरहित करण्यास व वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणेच्या खात्यावर जमा करण्यास या शासन निर्णयान्वये आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच रु.४.०००१ कोटीचा (अक्षरी रूपये चार कोटी एक हजार फक्त) धनादेश **मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा, पुणे** यांचे नांवे काढण्यात यावा. याप्रित्यर्थचा खर्च चालू आर्थिक वर्षातील अंदाजपत्रकामध्ये नमुद केलेल्या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. हा निधी कॅशफ्लोमध्ये उपलब्ध आहे.

**"मागणी क्रमांक एल-७ ए ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च,१०२ मृदसंधारण ए १०२( दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-केंद्र पुरस्कृत योजनेकरीता राज्य हिस्सा १०२ (०१) एकात्मिक पाणलोट विकास व्यवस्थापन कार्यक्रम-केंद्र पुरस्कृत कार्यक्रम २(४४०२ २३९६) ३१ सहायक अनुदान"**

५. केंद्र शासनाने मान्यता दिलेल्या २४३ प्रकल्पांची अंमलबजावणी करण्यासाठी प्रकल्प पूर्व तयारी करण्यासाठी सविस्तर सूचना या विभागाच्या संदर्भाधीन ३ व ४ येथील दिनांक २२ व २४ डिसेंबर, २००९च्या शासन निर्णयाान्वये देण्यात आल्या आहेत. हा निधी प्रामुख्याने एकात्मिक पाणलोट विकास व्यवस्थापन कार्यक्रमांतर्गत मंजूर प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तातडीने तयार करणे व प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेला (VSLNA) उपलब्ध करावा.

६ मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा(VSLNA) यांनी वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेचे मान्यतेने सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तातडीने तयार करणे व, प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता जिल्हा पाणलोट विकास युनिटसना (DWDU) यांना वितरीत करावा. तसेच सविस्तर प्रकल्प अहवालांना केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाची मान्यता घ्यावयाची असल्याने प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवाल जसजसे तयार होतील त्यानुसार वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणेची (VSLNA) मान्यता घेवून केंद्र शासनाला सादर करावेत.

७. त्याचप्रमाणे संचालक, मृदसंधारण तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा यांनी केंद्र शासनाचे संदर्भाधीन दिनांक २९ डिसेंबर,२००९ मधील पत्राच्या अटी व शर्ती नुसार पुढील कार्यवाही करावी.

८. हया कार्यक्रमाची वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा (VSLNA) च्या मान्यतेने भौतिक व आर्थिक प्रगती केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रांमधून केंद्र शासनास सादर करावी व त्याची एक प्रत राज्य शासनास सादर करावी.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचे वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२०१००२२६१६१६०९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( रेखा भिडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री, (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
सचिव, केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय (भूसंसाधन विभाग )निर्माण भवन, नवी दिल्ली
सहसचिव केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय (भूसंसाधन विभाग ) ब्लॉक क्र ११, ६वा मजला सिजिओ कॉम्प्लेक्स, लोधीमार्ग, नवीदिल्ली
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
अध्यक्ष वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोट विकास यंत्रणा,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
प्रधान मुख्य वनसंरक्षक, नागपूर.
जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा पाणलोटविकास युनिट( DWDU)
संचालक, मृदसंधारण व पाणलोटक्षेत्र व्यवस्थापन,तथा
मुख्य कार्यकारी अधिकारी , वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोटविकास यंत्रणा महाराष्ट्र राज्य, पुणे
वसुंधरा राज्यस्तरीय पाणलोटविकास यंत्रणा महाराष्ट्र राज्य यांचे नामनिर्देशित प्रतिनिधी
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई,

सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व मुख्य वनसंरक्षक,/ सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
सर्व सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
प्रमुख मार्गदर्शक, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,तथा आदर्श गाव प्रकल्प व संकल्प समिती
कार्याध्यक्ष, आदर्श गाव प्रकल्प व संकल्प समिती
महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)( ३ प्रती )
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (३ प्रती )
जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व (३ प्रती )
नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
ग्राम विकास व जलसंधारण विभागाचे सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी,
जल-८ (निवड नस्ती), ग्रा.वि.व ज.सं.विभाग, मंत्रालय, मुंबई.